## महाराष्ट्र शासन

<u>प्राथम्य/जनगणना</u>

क्र.- जनगणना २०१०/२९१/प्र.क्र.१८६/५
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक:२९ एप्रिल २०१०.

प्रति,

आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त,

विषय - जनगणना २०११ चे कामामधून माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षकांना वगळण्याबाबत.

संदर्भ : १) या विभागाचे दि.२७.४.२०१० चे समक्रमांकाचे शासन पत्र.
२) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई. यांचे पत्र क्रमांक:एमसीजी/ए-११९, दि.२७.४.२०१०
३) शालेय शिक्षण व क्रिडा विभागाचे पत्र क्र. औचिमु-२०१०/(२००/१०)/ माशि-२, दिनांक १६ एप्रिल २०१०

महोदय / महोदया,

या विभागाच्या संदर्भिय दि. २७/४/२०१० च्या पत्रास अनुसरुन असे स्पष्ट करण्यात येते की, जनगणनेच्या कामामधून माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षकांना वगळण्याबाबतच्या वरील पत्रातील सूचना हया केवळ दहावी व बारावी परिक्षांच्या अनुषंगाने पेपर तपासणी, निकाल व इयत्ता अकरावीच्या ऑन लाईन प्रवेशाच्या कामकाजाशी निगडीत असलेल्या शिक्षकांपुरतीच मर्यादित आहे. तेव्हा या संदर्भात असे कळविण्याचे मला निर्देश आहेत की, राज्यातील १० वी व १२ वी च्या परीक्षांचे निकाल लवकरात लवकर लागण्याच्या दृष्टीने केवळ १० वी व **१२ वी च्या परीक्षांची पेपर तपासणी, निकाल व ईयत्ता ११ वीच्या ऑनलाईन प्रवेशाच्या कामकाजाशी** निगडीत असलेल्या शिक्षकांनाच सन २०११ च्या जनगणनेच्या (१ मे २०१० ते १५ जून २०१० पर्यंतच्या) कामामधून वगळण्यात यावे. याबाबत पुढे असेही नमूद करण्यात येते की, दहावी शालांत परिक्षेच्या पेपर तपासणी व निकाल याशी निगडीत ज्या शिक्षकांना जनगणनेच्या कामातून वगळण्याचे प्रस्तावित आहे, त्यांचे बाबतीत संबंधित शाळांच्या मुख्याध्यापकांनी प्रमाणित केलेल्या अहवालाची संबंधित विभागीय मंडळाच्या कार्यालयातून खातरजमा

करुन घ्यावी. कारण काही राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळांकडून माध्यमिक शालांत प्रमाणपत्र व उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परिक्षेच्या उत्तरपत्रिका तपासण्याचे काम पूर्ण झाले आहे असे समजते. तसे असल्यास त्याशी संबंधित शिक्षकांना जनगणनेच्या कामातून वगळण्याचे प्रयोजन उरणार नाही. तसेच ईयत्ता अकरावीच्या ऑन लाईन प्रवेशाच्या कामकाजाशी निगडीत शिक्षकांना जनगणनेच्या कामातून वगळण्यापूर्वी त्या त्या संबंधित शाळा / महाविदयालयाच्या मुख्याध्यापक / प्राचार्यानी प्रमाणित केलेल्या अहवालाची सुध्दा खातरजमा संबंधित विभागीय उपसंचालकांकडून करुन घ्यावी.

आपला,

( निं.बा.रायलापूरकर )
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत-

प्रधान सचिव शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
संचालक, जनगणना, महाराष्ट्र, भारत सरकार एक्स्चेंज बिल्डींग, २ रा मजला, बेलार्ड ईस्टेट, मुंबई.
निवडनस्ती.